**विकास योजना - नेर नबाबपूर (जि. यवतमाळ)**

मौजे नेर येथील सर्व्हे क्र. २०७ (नविन) (पै) मधील क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम १९६६ चे कलम ३७(१क) अन्वयेची सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-२७०७/७४४/प्र.क्र.२०६/२००७/नवि-३०,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९**

**शासन निर्णय**:- सोबतची शासकीय सूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(शिवाजी पाटणकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, यवतमाळ.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, यवतमाळ जिल्हा परिषद, यवतमाळ.
५) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उपसंचालक, नगररचना, अमरावती विभाग, अमरावती.
७) सहायक संचालक नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ.
(त्यांना विनंती की, उक्त सुचनेतील प्रस्तावित फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाच्या ५ प्रती अधिप्रमाणित करण्यासाठी शासनास सत्वर सादर कराव्यात)
८) सरपंच, ग्राम पंचायत नेर नबाबपूर, जिल्हा यवतमाळ.
९) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, नागपूर.
(त्यांना विनंती की, सोबतची शासकीय सूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१ अमरावती विभागीय पुरवणीमध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)
१०) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(त्यांना विनंती की, सदरहू सुचना विभागाच्या वेब साईटवर प्रसिध्द करावी.)
११) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

<u>सूचना</u>

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६**

**क्रमांक: टिपीएस-२७०७/७४४/प्र.क्र.२०६/२००७/नवि-३० :** ज्याअर्थी, नेर नबाबपूर शहराची (जिल्हा अमरावती) सुधारित विकास योजना (यापुढे ज्यास "उक्त विकास योजना" असे संबोधिले आहे) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांची अधिसूचना क्र. वियो-नेर नबाबपूर/टीपीव्ही-२/५०८५, दिनांक २० जुलै, १९९१ अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १ नोव्हेंबर, १९९१ पासून अंमलात आली आहे ;

आणि त्याअर्थी, नेर नबाबपूर हे शहर गैर नगर परिषद असल्याने, उक्त विकास योजनेसाठी नियोजन प्राधिकरण म्हणून यवतमाळ जिल्हा पंचायत आहे (यापुढे ज्यास "उक्त नियोजन प्राधिकरण" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे नेर येथील सर्व्हे क्र. २०७ (नविन) (पै) मधील क्षेत्र (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधले आहे) कृषी विभागात समाविष्ट आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल" असे संबोधले आहे) आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त फेरबदलाबाबत फेरबदल प्रस्ताव कार्यान्वित करणेसाठी शासनाने आदेश क्र. टिपीएस-२७०७/७४४/प्र.क्र. २०६/२००७/नवि-३०, दिनांक ८ फेब्रुवारी, २००८ नुसार उक्त नियोजन प्राधिकरणास, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे ज्यास "उक्त अधिनियम" असे संबोधिले आहे) कलम ३७ (१) अन्वये निदेश दिले आहेत (यापुढे ज्यास "उक्त निदेश" असे संबोधले आहे) ;

आणि ज्याअर्थी, उक्त निदेशानुसार उक्त नियोजन प्राधिकरणाने उक्त फेरबदलाबाबतची सूचना उक्त निदेशाच्या दिनांकापासून ९० दिवसांच्या आत महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करणे आवश्यक होते. परंतु ९० दिवसाच्या अशा विहित मुदतीत अशी सूचना प्रसिध्द करण्यास उक्त नियोजन प्राधिकरण असमर्थ ठरले आहे ;

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम ३७ (१क) अन्वये प्रदत्त असलेल्या अधिकारानुसार शासन याद्वारे खालील प्रस्तावित फेरबदलासंदर्भात जनतेकडून सूचना / हरकती मागविण्यासाठी प्रस्तुतची सूचना प्रसिध्द करीत आहे. प्रस्तावित फेरबदलासंदर्भात काही सूचना / हरकती असल्यास त्यांनी ही सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत सहायक संचालक नगररचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांचेकडे लेखी स्वरुपात पाठवाव्यात. सहायक संचालक नगररचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांची, प्राप्त

होणा-या हरकती / सूचनांवर सुनावणी देण्याकरिता उक्त अधिनियमातील कलम १६२(१) अन्वये अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत असून त्यांनी त्यांचा अहवाल शासनास उपरोक्त मुदत संपल्यानंतर ३० दिवसांत सादर करावा.

## प्रस्तावित फेरबदल

"मौजे नेर येथील सर्व्हे क्र. २०७ (नविन)(पै) मधील क्षेत्र नकाशात दर्शविल्याप्रमाणे, कृषी विभागातून वगळून खालील अटीवर रहिवास विभागात समाविष्ट करण्याचे प्रस्ताविण्यात येत आहे-

**अट** - फेरबदलाखालील क्षेत्राच्या अभिन्यासात अनिवार्य १०% खुल्या जागेव्यतिरीक्त, अतिरीक्त १०% क्षेत्र सार्वजनिक सुविधासांठी ठेवण्यात यावे."

टिप :- (क) उपरोक्त प्रस्तावित फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा जनतेच्या अवलोकनार्थ खालील कार्यालयात, कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत उपलब्ध राहील.

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, यवतमाळ जिल्हा परिषद, यवतमाळ.
२) सहायक संचालक नगररचना, यवतमाळ विभाग, यवतमाळ.
३) सरपंच, ग्राम पंचायत नेर नबाबपूर, जिल्हा यवतमाळ.

(ख) सदर सूचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.**

**(शिवाजी पाटणकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**NOTICE**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated- 31st August, 2008**

**The Maharashtrta Regional & Town Planning Act. 1966**

**No. TPS-2707/744/CR.206/2007/UD-30:** Whereas the Development Plan Ner Nababpur (Dist. Yaotmal) has been sanctioned by the Director of Town Planning. Maharashtra State, Pune vide his Notification No. D.P. Ner Nababpur/TPV-II/5085, dated 20th july, 1991 & came in to force with effect from 1st November, 1991 (hereinafter referred to as "the said Development Plan") ;

And whereas, the planning authority for the said Development Plan is the Yaotmal Zilla Parishad as the city of Ner Nababpur is non municipal city (hereinafter referred to as "the said Planning Authority") ;

And whereas, in the said Development Plan, the land bearing Survey No. 207 (New) (Pt) of mauje Ner is included in Agricultural Zone. (hereinafter referred to as "the said Land") ;

And whereas, the Govt. is of the opinion that the said Land should be deleted from Agricultural Zone & land so released should be included in Residential Zone (hereinafter referred to as "the said Modification") ;

And whereas, Government vide Urban Development Department's Marathi Order No. टिपीएस-२७०७/७४४/प्र.क्र.२०६/२००७/नवि-३०, dated 8th November, 2008 has issued directives (hereinafter referred to as "the said Directive") under section 37(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") to the said Planning Authority to execute the modification proposal in respect of the said Modification;

And whereas, as per Government directives the the Planning Authority has to publish a notice of the said Modification within the period of 90 date from the date of the said Directive. However the said Planning Authority has failed to publish notice under section 37(1) of the said Act for inviting suggestions / objections on the proposed modification within stipulated time of 90 days;

Now therefore, in exercise of the powers vested under section 37(1A) of the said Act the Government finds it expedient to publish the following notice for inviting suggestions / objections from the general public within a period of 30 days from the date of publication of this notice in the official gazette. Any suggestions / objections on the proposed modification mentioned below be forwarded to the Assistant Director of Town Planning, Yaotmal Branch, Yaotmal who has been appointed as an officer under section 162(1) of the said Act to hear suggestions / objections and submit his report to government within 30 days after expiry of above mentioned period.

**PROPOSED MODIFICATION**

"The land bearing Survey No. 207 (New) (Pt) of mauje Ner is proposed to be deleted from Agricultural Zone & land so released should be included in Residential Zone as shown on the plan subject to following condition-

**Condition** - In the layout of the land under modification, apart from 10% compulsory open space, additional 10% space should be kept for public amenities."

**Note: - A)** A plan showing the above said proposed modification is kept open for inspection in the following offices on all working days during office hours.

1) The Chief Executive Officer, Yaotmal Zilla Parishad, Yaotmal.
2) The Assistant Director of Town Planning,Yaotmal Branch, Yaotmal.
3) The Sarpanch, Gram Panchayat Ner Nababpur, Dist. Yaotmal.

**B)** This notice is also available on Department's web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**(Shivaji Patankar)**
**Under Secretary to Government**